कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीच्या पदावरुन प्रत्यावर्तित करुन पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कृषिआ १०२३/प्र.क्र.१२४/१६अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
दिनांक : १९ जुलै, २०२३

**संदर्भ** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि.१७.१२.२०१६
२) शासन समक्रमांक दि.०२.०५.२०२३ रोजीचे पत्र.
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ.पुणे/नस्ती/आस्था-४/२०२३/९२/१६२१०, दि.१५.०५.२०२३

**शासन आदेश :-**

कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब(कनिष्ठ) (राजपत्रित) संवर्गातील श्री.मिलिंद अशोक भोईटे, श्री.किरण बुवासाहेब उदमले व श्री.भरत परशुराम कोळेकर हे तीन अधिकारी महिला व बालविकास विभागाच्या अखत्यारित बाल विकास प्रकल्प अधिकारी पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत होते. या अधिकाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपुष्टात आलेला असून त्यांना सदर पदावर मुदतवाढ देण्यात आलेली नाही. त्यामुळे सदर अधिकाऱ्यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने त्यांची महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारितील बाल विकास प्रकल्प अधिकारी पदावरील प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) संवर्गात पुन:स्थापना देण्याबाबत नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीसह कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील दि.१५.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील अधिकाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीच्या पदावरुन कृषि विभागात प्रत्यावर्तित करुन घेऊन त्यांना स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व सध्याची पदस्थापना | पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्री.मिलींद अशोक भोईटे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), खंडाळा,जि.सातारा | कृषि अधिकारी (विघयो) पंचायत समिती फलटण, जिल्हा परिषद, सातारा |
| २ | श्री.किरण बुवासाहेब उदमले, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), खटाव-१, जि.सातारा | कृषि अधिकारी (सामान्य) पंचायत समिती माण (दहीवडी), जिल्हा परिषद, सातारा |
| ३ | श्री.भरत परशुराम कोळेकर, बाल विकास प्रकल्प अधिकारी, फलटण-२, जि.सातारा | कृषि अधिकारी (विघयो) पंचायत समिती वाई, जिल्हा परिषद, सातारा |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांनी तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू व्हावे.

३. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१९११५०३०२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a77738ea5ab09abd99367b03338ce9c16517e87d42e99469f031c79ff053aeea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2023.07.19 11:51:34 +05'30'

**( ज्योत्स्ना अर्जुन )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
६. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
८. संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/उपविभागीय कृषि अधिकारी/कृषि विकास अधिकारी
९. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
११. सर्व संबंधित अधिकारी
१२. निवड नस्ती /१६अे.